**सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत आरोग्य सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कंत्राटी पध्दतीने नेमणूका करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१ (भाग-१)/सेवा-३**
गो.ते.रुग्णालय, संकुल इमारत, १० वा मजला
नवे मंत्रालय, मुंबई-४०० ०१
दिनांक: ०३ डिसेंबर,२०१८

**संदर्भ-**

१) शासन निर्णय, सा.आ.वि. क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१/सेवा-३, दि. ०२.०३.२०१५.
२) शासन निर्णय, सा.आ.वि. क्रमांकः मवैअ-१०५४/प्र.क्र.२४१/सेवा-३, दि. २१.०४.२०१५.

**प्रस्तावना-**

सार्वजनिक आरोग्य विभागांतर्गत महाराष्ट्र वैद्यकीय व आरोगय सेवा या संवर्गातील वैद्यकीय अधिकाऱ्यांच्या कंत्राटी पध्दतीने नेमणूका करण्याबाबतचे धोरण संदर्भाधिन क्र. १ अन्वये निश्चित केले आहे. तसेच संदर्भाधिन क्र.२ नुसार कंत्राटी नेमणुका करण्याच्या अनुषंगाने तशी समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीत सुधारणा करण्याची बाब शासनच्या विचाराधीन आहे.

**शासन निर्णय-**

संदर्भाधिन क्र. २ येथील शासन निर्णयामधील परिच्छेद क्र. १ मधील अनुक्रमांक २ येथे नमुद असलेले "जिल्हा स्तरावर जिल्हाधिकारी यांचे ऐवजी विभागीय आयुक्त यांचे अध्यक्षतेखाली एक समिती गठीत करण्यात यावी व सदर समितीमध्ये जिल्हाधिकारी किंवा त्यांचे प्रतिनिधी, जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा शल्यचिकित्सक सदस्य व उपसंचालक आरोग्य सेवा सदस्य सचिव असतील",हे रद्द करण्यात येत असुन आता त्याऐवजी पुढील समिती गठीत करण्यात येत आहे.

| | | |
|---|---|---|
| “जिल्हाधिकारी | - | अध्यक्ष |
| मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद | - | सदस्य |
| जिल्हा समाज कल्याण अधिकारी | - | सदस्य |
| जिल्हा शल्यचिकित्सक | - | सदस्य सचिव |
| जिल्हा आरोग्य अधिकारी | - | सदस्य |
| सहायक आयुक्त, आदिवासी विकास विभाग | - | सदस्य” |

२. संदर्भाधिन क्र. १ व २ येथील शासन निर्णयातील उक्त व्यतिरिक्त इतर सर्व अटी व शर्ती यापुढेही लागू राहिल.

३. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर प्रसिध्द करण्यात आले असून त्याचा संकेतांक क्रमांक २०१८१२०५१७१६२४८६१७ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Satish Hanmantrao Bhosale

Digitally signed by Satish Hanmantrao Bhosale
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Public Health Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4c0ff0607bc973d9663171bd9b8a9b9ab8cb569b155f9653d1180a4549819299, cn=Satish Hanmantrao Bhosale
Date: 2018.12.05 04:56:28 -08'00'

**(स.ह.भोसले)**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१) सचिव, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग, मंत्रालय, मुंबई.
२) विभागीय आयुक्त (महसूल) (सर्व
३) संचालक, आरोग्य सेवा, मुंबई
४) जिल्हाधिकारी (सर्व)
५) अधिष्ठाता, वैद्यकीय महाविद्यालये, वैद्यकीय शिक्षण व औषधी द्रव्ये विभाग (सर्व)
६) मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
७) अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
८) सह संचालक, आरोग्य सेवा (सर्व)

९) उप संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
१०) जिल्हा शल्यचिकित्सक, सामान्य रुग्णालय (सर्व)
११) जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
१२) मा. मंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१३) मा. राज्यमंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई
१४) प्रधान सचिव (आरोग्य) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई.
१५) महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखा परिक्षा / लेखा अनुज्ञेयता) मुंबई / नागपूर
१६) जिल्हा कोषागार अधिकारी (संबंधित)
१७) आयुक्त, कुटुंब कल्याण यांचे स्वीय सहायक.
१८) निवडनस्ती (सेवा-३)